**राजीनामा मंजूर करण्याबाबत.**
**श्री.म.ना.परिहार, महाव्यवस्थापक,**
**जिल्हा उद्योग केंद्र, गडचिरोली**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**आदेश क्र.इएसटी ३४१६/८०२/प्र.क्र.१२२/उद्योग-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१६

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्र.एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क.३३/९२/८, दिनांक ०२.१२.१९९७
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शा.नि.क्र.नियुक्ती-१०१५/प्र.क्र.५५/उद्योग-३, दिनांक १४.०६.२०१६
३) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.उसं/आस्थापना/नियुक्ती/परिहार/२०१६/अे-११०७, दिनांक १६.११.२०१६
४) उद्योग सहसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.उउसंना/आस्था/परिहार-राजीनामा/२०१६/२३५९,दि.२९.१०.२०१६ व दि.१६.११.२०१६

## आदेश

श्री.महेश नारायण परिहार, महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, गडचिरोली यांनी दिनांक २१.१०.२०१६ च्या अर्जाद्वारे स्वेच्छेने शासकीय सेवेचा राजीनामा दिला असून, उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय, नागपूर यांच्यामार्फत सक्षम प्राधिकारी म्हणून प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार यांना, त्याकरिता एक महिन्याची पूर्वसूचना देण्यात येत असल्याचे कळविले आहे. श्री.परिहार यांच्या राजीनाम्याचा अर्ज उद्योग संचालनालयाच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास दिनांक १६.११.२०१६ रोजी प्राप्त झाला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामध्ये निर्धारित केलेल्या तरतुदीनुसार सदर राजीनाम्याचा अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत सक्षम प्राधिकाऱ्यांने निर्णय घेणे आवश्यक आहे.

२. श्री.म.ना.परिहार यांची संदर्भ क्र.२ च्या आदेशान्वये उद्योग उपसंचालक (तां) गट (अ) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली असून सदर पदावर ते दि.२४.०६.२०१६ पासून कार्यरत आहेत. श्री.परिहार यांनी त्यांच्या कौटुंबिक अडचणीस्तव महाव्यवस्थापक पदाचा राजीनामा देत असल्याचे त्यांच्या दिनांक २१.१०.२०१६ च्या अर्जामध्ये नमूद केले असून लवकरात लवकर कार्यमुक्त करण्याची विनंती केली आहे. श्री.परिहार यांचा राजीनाम्याचा अर्ज उद्योग सह संचालक,

विभागीय कार्यालय, नागपूर यांच्या दि.२९.१०.२०१६ च्या पत्रान्वये प्राप्त झाला असल्यामुळे, एक महिन्याचा कालावधी दि.२९.११.२०१६ रोजी संपतो. सबब श्री.परिहार यांचा दि.२९.११.२०१६ पासून राजीनामा स्वीकृत करण्यात येत आहे. सदरचा राजीनामा दि.२९.११.२०१६ पासून अंमलात येईल. श्री.म.ना.परिहार यांचा राजीनामा अंमलात आल्याच्या दिनांकापासून ते शासकीय सेवेचा हक्क गमावतील.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील परि.२ (इ) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२९१२४१४१८६१० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Rekha Vijay Katam

Digitally signed by Rekha Vijay Katam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy And Labour Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9352394c5fbeafbc5c266000f4b8286340a29f5571de6af08bdbf9a1fd49308f, serialNumber=765f3e5789e2ad81a606fa69708cc0715d7b8b6e38b84425ee4ca3aa7f4a0782, cn=Rekha Vijay Katam
Date: 2016.11.29 12:47:17 +05'30'

**( रेखा काटम )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा) मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी व लेखा अधिकारी, मुंबई.
८. उद्योग सहसंचालक, सर्व विभागीय कार्यालये, (उद्योग संचालनालयामार्फत),
९. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, गडचिरोली (उद्योग संचालनालयामार्फत),
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली (उद्योग संचालनालयामार्फत),
११. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१२. श्री.महेश नारायण परिहार, महाव्यवस्थापक गट (अ), जिल्हा उद्योग केंद्र, गडचिरोली यांना त्यांच्या दिनांक २१.१०.२०१६ च्या अर्जाच्या अनुषंगाने.
१३. कार्यासन उद्योग-३ (निवडनस्ती)